६९ व्या तुकडीतील परिविक्षाधीन भारतीय पोलीस सेवेतील सात सहाय्यक पोलीस अधीक्षक दर्जाच्या अधिकाऱ्यांना वेतन व भत्त्यासाठी निधी उपलब्ध करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आयपीएस-०३१८/प्र.क्र.७०/पोल-१,**
२ रा मजला, मंत्रालय, मादाम कामा रोड, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ डिसेंबर, २०१८.

**संदर्भ** :- १. विशेष पोलीस महानिरिक्षक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई,यांचे पत्र क्र.प्रशि/प्रशि-२/६९ आर आर बॅच/९८३/२०१७/१२७, दिनांक ०६.०१.२०१८.
२. शासन निर्णय गृह विभाग क्रमांक : आयपीएस-०३१८/प्र.क्र.७०/पोल-१, दि.०८.०२.२०१८

**शासन निर्णय :-**

भारतीय पोलीस सेवेच्या ६९ व्या तुकडीतील सात परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना ते महाराष्ट्र राज्यात परिविक्षाधीन म्हणून रुजू झाल्यापासून म्हणजेच दि.११.१२.२०१७ ते दि.२२.०६.२०१८ पर्यतच्या कालावधीत महाराष्ट्र राज्यात प्रशिक्षण घेण्याकरीता 'सहाय्यक पोलीस अधीक्षकाची' सात अधिसंख्य पदे निर्माण करण्यास, तसेच या ७ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना दि.११.१२.२०१७ ते दि.२२.०६.२०१८ (६ महिने ११ दिवस) पर्यंत महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक आणि त्यानंतर त्यांना नेमूण देण्यात आलेल्या जिल्हयात प्रशिक्षण कालावधीकरीता वेतन व भत्ते यासाठी रु.३४,०२,०००/- (रुपये चौत्तीस लाख दोन हजार फक्त) इतका खर्च भागविण्यास, संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय, दिनांक ०८.०२.२०१८ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

या सात परिविक्षाधीन पोलीस अधिकाऱ्यांपैकी पुढील ४ अधिकाऱ्यांना दि.२३.०६.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ या कालावधीकरिता वेतन व भत्ते यासाठी रु.१६,४८,८३६/- (अक्षरी सोळा लाख, अठ्ठेचाळीस हजार, आठशे छत्तीस फक्त) इतका खर्च करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रशिक्षणार्थींचे नांव | प्रशिक्षणासाठी नियुक्तीचा जिल्हा | नवीन बदलीवरील पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री. समीर अस्लम शेख | अमरावती (ग्रामीण) | सहायक पोलीस अधीक्षक व उप विभागीय पोलीस अधिकारी, सातारा शहर, उप विभाग, सातारा |
| २ | श्री. सौरभ कुमार अग्रवाल | पुणे (ग्रामीण) | सहायक पोलीस अधीक्षक व उप विभागीय पोलीस अधिकारी, चोपडा उप विभाग, जळगांव |
| ३ | श्री. निलाभ रोहन | अहमदनगर | सहायक पोलीस अधीक्षक व उप विभागीय पोलीस अधिकारी, इचलकरंजी उप विभाग, कोल्हापूर |
| ४ | श्री.मुम्मका सुदर्शन | नाशिक (ग्रामीण) | पदस्थापनेसाठी प्रतिक्षाधीन |

२. उपरोक्त ४ परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या वेतन व भत्यासाठी होणारा खर्च "२०५५-पोलीस-१०९ (०१) जिल्हा पोलीस बल " या उपलेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून वेतन व भत्ते या उद्दीष्टामधून सन २०१८-१९ या वर्षीच्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय, क्र. पदनि २०१२/प्र.क्र.६६/१२/वित्तीय सुधारणा, दिनांक ११ जुलै, २०१२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१७१५२७४०९४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Tushar Vasant Mahajan

Digitally signed by Tushar Vasant Mahajan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, serialNumber=1a39cef3c157b9ee6a2abe5779acf233682613f7b9c335d6bf4877267695ceca, cn=Tushar Vasant Mahajan
Date: 2018.12.17 15:37:03 +05'30'

**( तुषार महाजन )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
३) अपर पोलीस महासंचालक (प्रशिक्षण व खास पथके), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा, जळगांव, कोल्हापूर
८) सह संचालक (तांत्रिक), लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई (२ प्रती).
९) वित्त विभाग (व्यय-७/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय, मुंबई.
१०) सहाय्यक संचालक, भापोसे कक्ष, गृह विभाग, २ रा मजला, मंत्रालय, मुंबई.
११) अवर सचिव, कार्यासन बीयुडी-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) वैयक्तिक नस्ती / निवड नस्ती (पोल-१).